# मुंग्या आणि पेन

इद्रिस शाह





एकदा एक मुंगी एका कागदावर चालू लागली.



तिने कागदावर काळ्या रेघोट्या ओढणारं पेन पाहिलं.



“काय कमाल वस्तू आहे! किती मुक्तपणे जगतेय!” मुंगी आश्चर्याने म्हणाली.

“किती चपळाईने आणि उत्साहाने फिरतेय ही, कागदाच्या सुंदर पृष्ठावर! तिची ही उर्जा साऱ्या जगातल्या मुंग्यांच्या एकूण श्रमाएवढीच भरेल.



आणि तिने ओढलेल्या या रेघोट्या....



....अगदी मुंग्यांच्या रांगेसारख्या दिसतात.
लाखो, कोट्यवधी मुंग्या एकामागोमाग
पळतायत, असं वाटतं.”

ती मुंगी खूप उतावीळ झाली आणि आपला अनुभव इतर मुंग्यांना सांगण्यासाठी पळू लागली.



वाटेत जी पहिली मुंगी भेटली, तिला तिने ही गोष्ट सांगितली.



दुसऱ्या मुंगीलादेखील पेनने ओढलेल्या रेघोट्या पाहून स्फुरण चढलं. पहिल्या मुंगीने तीक्ष्ण निरीक्षण करून या गोष्टीचा शोध लावला, म्हणून तिने पहिल्या मुंगीचं अभिनंदन केलं.





पण तिसरी मुंगी मात्र या गोष्टीने प्रभावित झाली नाही. ती म्हणाली: “मला वाटतं, तुम्ही भावनेच्या भरात वाहून जात आहात. थोडं डोकं वापरा. एका मुंगीच्या दृष्टिकोनातून या गोष्टीची वैज्ञानिक चिकित्सा करा.

या गोष्टीकडे तुम्ही माझं लक्ष वेधून घेतलं, म्हणून मग मी त्या रेघोट्या ओढणाऱ्या वस्तूचं निरीक्षण केलं.

आणि मी एका मुंगीच्या सखोल वैज्ञानिक चिकित्सेच्या आधारे निष्कर्ष काढलाय की ही वस्तू एकटं काम करत नाहीये.



तुमच्या लक्षात नाही आलं का? ही वस्तू आसपासच्या इतर गोष्टींशी जोडलेली आहे.



माझ्या वैज्ञानिक निष्कर्षानुसार या
इतर गोष्टीच तिला उर्जा पुरवतायत.



आणि तिला उर्जा पुरवणारी वस्तूच या
रेघोट्या ओढायला कारणीभूत आहे.”



अशा तऱ्हेने मुंग्यांच्या समूहाला
प्रथमच बोटांचा शोध लागला.





मग काय विचारता, आणखी एका
मुंगीने या वैज्ञानिक शोधाची
पडताळणी करून पाहायचं ठरवलं.

बोटांना समजून घेण्यासाठी ती
त्यावर चढली आणि मनसोक्त
फिरू लागली.



हेच तर काम असतं संशोधक मुंग्यांचं!



सगळ्या बोटांची पडताळणी केल्यावर ती मुंगी या निष्कर्षावर आली की सगळी बोटं मिळून हाताचा पंजा बनतो.





ती मुंगी आपला हा शोध सर्वांना
सांगण्यासाठी उतावीळ झाली आणि
पळू लागली.



जी मुंगी तिला प्रथम
भेटली तिला तिने ही
गोष्ट सांगितली.



ही नवी मुंगी हाताच्या पंजाचे वर्णन ऐकून हरखली. पहिल्या मुंगीने तीक्ष्ण निरीक्षण करून या गोष्टीचा शोध लावला, म्हणून तिने पहिल्या मुंगीचं अभिनंदन केलं.



काळ सरत गेला, तसतसं इतर मुंग्याही चाचणी, पडताळणी करून आपलं आकलन वाढवू लागल्या.





एका मुंगीने शोध लावला
की पंजा हाताला जोडलेला
असतो.



दुसऱ्या मुंगीने शोध लावला की हात धडाला जोडलेला असतो.



तिसऱ्या मुंगीने शोधलं की धडाला दोन हात असतात.



मुंग्यांना हेसुद्धा कळलं की हातांसारखेच पायसुद्धा असतात. पण ते रेघोट्या ओढण्याचं काम करत नाहीत.



संशोधन पुढे-पुढे सरकू लागलं तसतसं लेखन कसं करतात, हे मुंग्यांना कळत गेलं.



पण हे सारं संशोधन लेखनाच्या तंत्राबद्दल होतं. पेनने नेमकं काय लिहिलं, हे मात्र मुंग्यांना या संशोधनातून समजलं नाही.



त्यामुळे या संशोधनानंतर तुम्ही कुणा मुंगीला एखादा शब्द वाचण्यास सांगितला......किंवा मग पेनने ओढलेल्या रेघोट्या काय सांगत आहेत, हे विचारलं....

....तर मुंग्या शून्य नजरेने तुमच्याकडे पाहात बसतील.





....आणि म्हणतील कि तुम्हाला
मुंग्यांनी केलेल्या सखोल संशोधनातलं
काही समजलंच नाही.

